**शालार्थ, पवित्र आणि सरल प्रणालीकरीता घेण्यात आलेल्या Cloud service सेवेच्या अनुषंगाने देयकाची रक्कम अदा करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: ईगव्ह ०२२४/प्र.क्र.०१/ संगणक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तारीत इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २८ मार्च, २०२४.

**वाचा:-**

आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्र. आशिका/२०२४/ईएसडीएस/क्लाऊड/ईगव्ह-१४३/२१०१, दि.२१.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या ई-गव्हर्नन्स अंतर्गत विविध प्रकल्पांसाठी Cloud service उपलब्ध करुन घेण्यासाठी GeM portal द्वारे निविदा प्रक्रीया राबवून M/s ESDS Software solutions ltd. या कंपनीची निवड करण्यात आली असून दि. २३ नोव्हेंबर २०२२ रोजीच्या पत्रान्वये सदर कंपनीस Cloud service उपलब्ध करुन देणेबाबत कार्यादेश देण्यात आले आहेत. त्यानुसार M/s ESDS Software Solutions Ltd. यांनी शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या इंगव्हर्नन्स अंतर्गत चालू असलेल्या प्रकल्पांसाठी १५ जानेवारी २०२३ पासन आवश्यकतेनुसार cloud service पुरविलेली आहे. त्यानुषंगाने, M/s ESDS Software Solutions Ltd. यां कंपनीकडून दि.०१.०७.२०२३ ते दि. ३१.१२.२०२३ या कालावधीतील उपलब्ध Cloud service करीताचे रुपये १,६९,४०,३२३/- (एकूण एक कोटी एकोणसत्तर लाख चाळीस हजार तीनशे तेवीस रुपये फक्त) अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांनी संदर्भाधीन पत्रान्वये केलेल्या विनंतीनूसार M/s ESDS Software Solutions Ltd. यां कंपनीकडून दि.०१.०७.२०२३ ते दि. ३१.१२.२०२३ या कालावधीतील उपलब्ध Cloud service करीताचे रक्कम रुपये १,६९,४०,३२३/- (एकूण एक कोटी एकोणसत्तर लाख चाळीस हजार तीनशे तेवीस रुपये फक्त) एवढी रक्कम वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च मागणी क्रमांक ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८०-सर्वसाधारण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम (२२०२H४५४) ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षातून सन २०२३-२४ च्या उपलब्ध तरतुदीमधून भागविण्यात यावा. यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक व सहायक संचालक, (लेखा) माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका २०१५ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग- २ मधील अनुक्रमांक २७ अ मधील नियम क्र. ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४३४/व्यय-५, दिनांक २६.०३.२०२४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२८१६३०३५७५२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK GULABRAO SAPKAL

Digitally signed by VIVEK GULABRAO SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=55c54ce6c9bede7daecd096d20450a76c60783cb1318374f8764a2da64d548a5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50EDF35541F970C25C79ED803C981C8C9EBC19E27CDBAD124BB5C63AA9962A6B, cn=VIVEK GULABRAO SAPKAL
Date: 2024.03.28 16:39:50 +05'30'

**( विवेक सपकाळ )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा.अ.मु.स. वित्त विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२) मा.अ.मु.स. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३) मा.प्र.स.माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर१/२.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर१/२.
८) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
९) निवडनस्ती/संगणक कार्यासन.